अतितात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य

आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रीमांची भरपाईबाबत.
(फेब्रुवारी, २०२० चे अर्थसंकल्पीय अधिवेशन)

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : आकनि - २०२०/प्र.क्र.६२/अर्थ-३.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १८ मार्च , २०२०.

संदर्भ :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक - २०२०/प्र.क्र.६/अर्थ-३, दि. २० जानेवारी, २०२०.

**परिपत्रक**

सन २०१९ - २० या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दिनांक २४ फेब्रुवारी, २०२० रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले असून सदर पूरक खर्चाच्या विवरणपत्रात आकस्मिकता निधी भरपाईसाठी पूरक मागण्या समाविष्ट करण्यात आल्या आहेत. आकस्मिकता निधीतून घेण्यात आलेल्या सदर अग्रीम रकमा दर्शविणारे विवरणपत्र या सोबत पाठविण्यात येत आहे. "महाराष्ट्र (पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२०" आता मंजूर झाला असल्याने संबंधित मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की, या परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रात नमूद करण्यात आलेल्या बाबींवरील खर्च हा आता आकस्मिकता निधीच्या खर्च खाती टाकू नये व तसे संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळवावे.

२. आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीम रकमांच्या बाबतीत पुरवणी विनियोजने विधानमंडळाने मंजूर केलेली असून ती, "महाराष्ट्र (पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२०" (सन २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक - १, दिनांक ४ मार्च, २०२०) यामध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - एक, महाराष्ट्र, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, या परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-३ मध्ये नमूद करण्यात आलेल्या रकमेतून झालेल्या खर्चाऐवढ्या रकमेची आकस्मिकता निधीमध्ये भरपाई करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००३१८१२५२०८३४०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA NARAYAN MALI

Digitally signed by RAVINDRA NARAYAN MALI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=e179532c4dfe4e00f18484c27eb7841776acc38706150f1c9c5832 95fe07c33f, postalCode=400032, street=FINANCE DEPARTMENT,5TH FLOOR,MAIN BLDG,BUDGET SECTION,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=e3384d6fecc2326dc6e6518d7f6323190f97d32defab86f46 a5b7239d6a79d06, ou=FINANCE DEPARTMENT MANTRALAYA MUMBAI, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA NARAYAN MALI
Date: 2020.03.18 13:12:24 +05'30'

( र. ना. माळी )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

सोबत - आकस्मिकता निधी अग्रीमांचे विवरणपत्र

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई. (२५ प्रती)
३. महालेखापाल( लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई. (२५ प्रती)
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर. (२५ प्रती)
५. महालेखापाल(लेखापरीक्षा),महाराष्ट्र,नागपूर.(२५प्रती)
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई. (५ प्रती)

७. सह संचालक, लेखा व कोषागारे,संगणक शाखा,५ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई - ३२ (५ प्रती)
८. अपर संचालक (इ.आ.सं.) अर्थ व सां. संचालनालय,७ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई-३२ (२ प्रती)
९. सर्व कोषागार अधिकारी.
१०. कार्यासन अधिकारी, प्रशासन-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (क-शाखा), विधानभवन, मुंबई-३२.
१२. सर्व कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, वित्त विभाग, आकस्मिकता निधीतील आगाऊ रकमांची आधीच भरपाई करण्यात आलेली असल्याने यासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या आकस्मिकता निधीच्या आगाऊ रकमांच्या संबंधातील खर्च आकस्मिकता निधीच्या खर्च खाती टाकला जात नाही, याची खात्री करुन घ्यावी.
१३. निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

# विवरणपत्र

## सन २०२० चे विधीमंडळ अधिवेशन फेब्रुवारी, २०२० मध्ये भरपाई करण्यात आलेल्या आकस्मिकता निधी अग्रिमांचे विवरणपत्र.

| अ.क्र. | वित्त विभागाच्या ज्या ज्ञापनाद्वारे आगाऊ रक्कम मंजूर करण्यात आली त्या शासकीय ज्ञापनाचाक्रमांक व दिनांक | विषय | अग्रिमाची रक्कम (रुपये) | पुरवणी मागणीची रक्कम (रुपये) | पुरक मागणी चा पृष्ठ क्रमांक | पुरक मागणी चा बाब क्रमांक | अग्रिमांच्या वापरासंबंधी विभागाच्या आदेशाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| सार्वजनिक आरोग्य विभाग | | | | | | | |
| २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य | | | | | | | |
| १. | क्र.आकनि-२०२०/प्र.क्र.१/अर्थ-९, दिनांक १५ जानेवारी २०२० | नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालयास सहायक अनुदान देण्यासाठी | २४,००,००,००० | २४,००,००,००० | ७१ | ११२ | क्र. अनुदान-२०१८/प्र.क्र.४९७/राकावि-२, दिनांक १६ जानेवारी, २०२०. |
| विधी व न्याय विभाग | | | | | | | |
| ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च | | | | | | | |
| २. | क्र.आकनि-२०२०/प्र.क्र.२/अर्थ-१२, दिनांक १३ फेब्रुवारी २०२० | नाशिक येथील जिल्हा न्यायालय इमारत बांधकामासाठी | १,००० | १,००० | ३३ | ४७ | क्र.सीसीबी-१११९/प्र.क्र.९७/का-१३, दिनांक १४ फेब्रुवारी, २०२० |
| सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | | | | | | | |
| २४३५- इतर कृषीविषयक कार्यक्रम | | | | | | | |
| ३. | क्र.आकनि-२०२०/प्र.क्र.३/अर्थ१३, दिनांक २० फेब्रुवारी २०२० | महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना -२०१९ या योजनेच्या अंमलबजावणीसाठी | १०००,००,००,००० | १०००,००,००,००० | ८३ | १२९ | क्र.सीसीबी-१११९/प्र.क्र.९७/का-७, दिनांक २० फेब्रुवारी, २०२० |